संगणक सांकेतांक - 202004201544390010

कोरोना विषाणूच्या प्रादुर्भावाने उद्भवलेल्या परिस्थितीमुळे महाराष्ट्र राज्यातील कार्यरत असलेल्या वाष्पकांना. वाष्पके अधिनियम १९२३ च्या कलम ३४ उपकलम (२) अन्वये शासनास प्रदान केलेल्या अधिकारानुसार कलम ६ च्या खंड (क) व कलम ८ च्या खंड १ (अ), (३), (४), (५) , (६) व (७) उपबंधाच्या अमलबजावणीतुन सूट देण्याबाबत

महाराष्ट्र शासन

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई-४०००३२.

शासन निर्णय, क्र.बाष्पके-०३२०/प्र.क्र.५७/२०२०/कामगार-१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- २३ मार्च, २०२०.

वाचा : संचालक, वाष्पके संचालनालय यांचे पत्र क्र.एस.बी-१/२०२०/५०७५ दि.२३.०३.२०२०

प्रस्तावना:-

वाष्पके अधिनियम १९२३ नुसार वाष्पक वापरासाठी बाष्पकांचे निरीक्षण होऊन प्रामाणिकीकरण करणे आवश्यक आहे. वाष्पके निरीक्षण करण्याकरिता त्याचे कायद्याप्रमाणे भारतीय वाष्पके विनियम १९५० च्या विनियम ३७६ व विनियम ३९० अन्वये स्वच्छता करून जलदाब चाचणी करणे व निरीक्षण करून पुढील वापरास प्रमाणित करणे आवश्यक असते. हि प्रक्रिया करण्याकरिता मोठ्या प्रमाणात मनुष्यबळाची आवश्यकता असते. कोरोना विषाणूचा संसर्ग प्रतिबंधित करण्यासाठी शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार मनुष्यबळाची उपलब्धता कमी होणे अपेक्षित आहे. तथापि काही अत्यावश्यक सेवा देणारे कारखाने, तेलशुद्धीकरण कारखाने, औषध निर्मिती कारखाने व इतर कारखाने अविरतपणे चालू असणे आवश्यक आहे. त्यामुळे अत्यावश्यक सेवा देणाऱ्या कारखान्यातील बाष्पके अविरत व अखंडपणे चालू असणे

गरजेचे आहे. कोरोना विषाणूच्या प्रादुर्भावाने उद्भवलेल्या परिस्थितीमध्ये सदर कारखाने सुरु राहावे हि बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

बाष्पके अधिनियम १९२३ च्या कलम ३४ (२) अन्वये राज्य शासनास प्रदान केलेल्या अधिकारानुसार महाराष्ट्र राज्यातील ज्या बाष्पकांची गुदत ३०.०४.२०२० पर्यंत संपत आहे अश्या बाष्पकांना बाष्पके अधिनियम १९२३ च्या कलम ६ (क), ८ (१) (अ), ८ (३), ८ (४), ८ (५), ८ (६) व ८ (७) उपबंधाच्या अमलबजावणीतुन पुढील आदेशापर्यंत सूट प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ. श्री.ल. पुलकुंडवार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत माहितीस्तव,

१) म. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा / विधानपरिषद
३) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
६) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक
७) मा. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक
८) विकास आयुक्त, उद्योग संचालनालय यांचे स्वीय सहायक
९) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांचे स्वीय सहायक
१०)संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई.
११) सर्व प्रादेशिक विभाग प्रमुख, बाष्पके (द्वारा: संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई)
१२) निवड नस्ती (कामगार-१)